समादेशक, राज्य राखीव पोलीस बल गट क्र.८, मुंबई यांच्या कार्यालयासाठी अत्यावश्यक असलेल्या दैनंदिन उपयोगाच्या साधनसामुग्रीच्या खरेदीसाठी झालेल्या खर्चास मान्यता देणेबाबत.

महाराष्ट्र शासन

गृह विभाग

शासन निर्णय क्रमांक पीईक्यू-१००१/प्र.क्र.३०/पोल-४,

मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२, दिनांक ०८ एप्रिल,२००२,

वाचा :- १) पोलीस महासंचालक, महाराष्ट्र राज्य, मुंबई यांचे पत्र क्र.पोमसं/१९/१९-अे/ रा.रा.पो.बल गट-८/९७, दि.११.१२.१९९७.

२) समादेशक, रा.रा.पो. बल गट क्र.८, मुंबई यांचे पत्र क्र.पशा/३१६७-६९/९७, दि.३.१२.१९९७.

३) समादेशक, रा.रा.पो. बल गट क्र.८, मुंबई यांचे पत्र क्र.पशा/२/३६८/९९, दि.१.३.१९९९.

**शासन निर्णय :-** समादेशक, राज्य राखीव पोलीस बल गट क्र.८, मुंबई यांनी त्यांच्याकडील साधनसामुग्रीचा साठा संपल्यामुळे सन १९९६-९७ मध्ये कार्यालयीन कामकाज सुरळीत चालण्यासाठी रु.१,३८,०९२/- (रुपये एक लक्ष अडतीस हजार ब्याण्णव फक्त) रकमेचे उपभोग्य भांडार सामान आवश्यकतेप्रमाणे स्थानिक बाजरातून विहित पध्दीतीने खरेदी केलेले असून तेव्हा पासून पुरवठादारांची देयके शासन मंजूरी अभावी प्रलंबित आहेत. सदर रु.१,३८,०९२/- रकमेच्या प्रलंबित देयकांना शासन मंजूरी देण्यात येत आहे.

२. प्रस्तुत प्रकरणी होणारा खर्च गृह विभाग, मागणी क्र.बी-६, लेखाशीर्ष "२०५५-पोलीस, १०९ जिल्हा पोलीस, १०९ (एक) (१), जिल्हा पोलीस बल" या लेखाशीर्षाखाली खर्ची टाकून तो चालू सन २००२-०३ च्या मंजूर अनुदानातून भागविण्यात यावा.

३. वित्त विभाग शासन निर्णय क्र.विअप्र-१०००/प्र.क्र.४६/२००१/विनियम, दि.११.७.२००१ सोबतच्या परिशिष्टातील वित्तीय अधिकार नियम पुस्तिका १९७८ भाग पहिला, उपविभाग १, अ.क्र.६, नियम क्र.४० आणि उपविभाग-२, अ.क्र.४६ नियम क्र.१६९ अन्वये प्रदान करण्यात आलेल्या अधिकारांचा वापर करुन अपर मुख्य सचिव (गृह) महाराष्ट्र शासन यांच्या मान्यतेने हा शासन निर्णय निर्गमित करण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

(स्वाक्षरी) ८/४/०२

( रा. बा. घांडगे)

कार्यासन अधिकारी, गृह विभाग, महाराष्ट्र शासन.

प्रति,

पोलीस महासंचालक, महाराष्ट्र राज्य, मुंबई.

समादेशक, राज्य राखीव पोलीस बल गट क्र.८, गोरेगांव, मुंबई

महालेखापाल, महाराष्ट्र - १ (लेखा व अनुज्ञेयता/लेखा परिक्षा), मुंबई.

अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई.

निवासी लेखा परिक्षा अधिकारी, मुंबई.

वित्त विभाग (व्यय-७/विनियम), मंत्रालय, मुंबई.

गृह विभाग (कार्यासन/बीयुडी-१), मंत्रालय, मुंबई.

निवड नस्ती